**ग्राहक जनजागृतीच्या क्षेत्रात कार्य करणाऱ्या नोंदणीकृत संस्थांना सहाय्यक अनुदान वितरीत करण्याबाबत मार्गदर्शक सूचना.**

## महाराष्ट्र शासन

**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : ग्राकनि-२०१७/प्र.क्र.५२/ ग्रासं-२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २६ जुलै, २०१७.

**वाचा :** महाराष्ट्र ग्राहक संरक्षण व मागदर्शन निधी नियम, १९९२

**प्रस्तावना :-**

राज्यातील ग्राहक जनजागृतीच्या क्षेत्रात कार्य करणाऱ्या नोंदणीकृत संस्थाना सहाय्यक अनुदान वितरीत करण्यात येते. ग्राहक जनजागृतीच्या क्षेत्रात कार्य करणाऱ्या नोंदणीकृत संस्थांकडून प्राप्त होणाऱ्या अर्जानुसार अनुदान देण्याची प्रत्यक्ष कार्यवाही करतांना प्रचलित पध्दतीमध्ये बदल करणे आवश्यक असल्याचे दिसून आले. त्यामुळे या योजनेच्या अंमलबजावणीबाबत सर्वसमावेशक व व्यवहार्य अशा नवीन मार्गदर्शक सूचना तयार करुन त्यानुसार या योजनेची अंमलबजावणी करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

वरील पार्श्वभूमी विचारात घेता, ग्राहक जनजागृतीच्या क्षेत्रात कार्य करणाऱ्या नोंदणीकृत संस्थांची निवड करतांना व त्यांना सहाय्यक अनुदान देण्यासाठी मार्गदर्शक सूचना निर्गिमित करण्यात येत आहेत.

**योजनेचे प्रयोजन:**

महाराष्ट्रात आज ग्राहक चळवळ, ग्राहक जनजागृती हे क्षेत्र वगळता इतर क्षेत्रात कार्य करणाऱ्या अनेक संस्था कार्यरत आहेत. सदर संस्थांची मुख्य उद्दिष्टे जरी ग्राहक चळवळ, ग्राहक जनजागृती नसली तरी, बऱ्याच संस्था त्यांच्या संस्थेचे मुख्य कार्य करण्याबरोबरच, ग्राहक जनजागृती कार्यक्रमांचे आयोजन करुन ग्राहकांच्या हक्कांचे संरक्षण व संवर्धनाचे कार्य करीत आहेत. याव्दारे महाराष्ट्रातील ग्राहक जनजागृतीच्या क्षेत्रात कार्यरत राहून, ग्राहक चळवळीचे जतन व संवर्धन या संस्थांमार्फत करण्यात येते. यासाठी केवळ शासन स्तरावरुन राष्ट्रीय ग्राहक दिन व जागतिक ग्राहक दिन या निमित्त जनजागृतीचे कार्यक्रम करणे अभिप्रेत नसून, खाजगी मान्यताप्राप्त / नोंदणीकृत संस्थांव्दारेदेखील ग्राहक जनजागृतीचे कार्य करणे आवश्यक आहे. सदर बाब विचारात घेऊन ग्राहक जनजागृतीच्या क्षेत्रात कार्य करणाऱ्या नोंदणीकृत संस्थांना प्रोत्साहन मिळावे यासाठी त्यांना सहाय्यक अनुदान देण्यात येणार आहे.

**संस्था निवडीचे निकष** -

ग्राहक जनजागृतीच्या क्षेत्रात कार्य करणाऱ्या नोंदणीकृत संस्थांनी प्रतिवर्षी संबंधित जिल्हाधिकाऱ्यांकडे अनुदानासाठी विहित नमुन्यात सोबत जोडलेल्या मार्गर्शक सूचनांनुसार अर्ज

केल्यानंतर सदर अर्जांची छाननी करुन मार्गर्शक सूचनांनुसार अनुदानासाठी पात्र ठरणाऱ्या संस्थांना ग्राहक कल्याण निधी व्यवस्थापन समितीच्या मान्यतेने खालीलप्रमाणे अनुदान वितरित करण्यात येईल.

| अ. क्र. | अनुदानाची रक्कम | संस्थांची संख्या | एकूण अनुदानाची रक्कम | अनुदानासाठी संस्थेच्या मूल्यांकनाचे निकष |
|---|---|---|---|---|
| १ | ₹.२ लाख प्रत्येकी | ४ | ₹.८ लाख | १. सदर संस्था ही १५ वर्षापेक्षा जास्त कालावधीसाठी कार्य करणारी व राज्यातील नामांकित अशी मान्यताप्राप्त ग्राहक संस्था असावी.<br>२. संस्थेने मागील ३ वर्षात किमान ७ ग्राहक जनजागृतीचे कार्यक्रम केलेले असावेत व यासाठी तीन वर्षात मिळून एकूण ४ लाख इतका किमान खर्च ग्राहक जनजागृतीसाठी केलेला असावा. |
| २ | ₹.१ लाख प्रत्येकी | १० | ₹.१० लाख | १. सदर संस्था ही १० वर्षापेक्षा जास्त कालावधीसाठी कार्य करणारी व राज्यातील नामांकित अशी मान्यताप्राप्त ग्राहक संस्था असावी.<br>२. संस्थेने मागील ३ वर्षात किमान ७ ग्राहक जनजागृतीचे कार्यक्रम केलेले असावेत व यासाठी तीन वर्षात मिळून एकूण ४ लाख इतका किमान खर्च ग्राहक जनजागृतीसाठी केलेला असावा. |
| ३ | ₹.५० हजार प्रत्येकी | २५ | ₹.१२.५ लाख | १. सदर संस्था ही ५ वर्षापेक्षा जास्त कालावधीसाठी कार्य करणारी व राज्यातील नामांकित अशी मान्यताप्राप्त ग्राहक संस्था असावी.<br>२. संस्थेने मागील ३ वर्षात किमान ७ ग्राहक जनजागृतीचे कार्यक्रम केलेले असावेत व यासाठी तीन वर्षात मिळून एकूण ४ लाख इतका किमान खर्च ग्राहक जनजागृतीसाठी केलेला असावा. |

ग्राहकांमध्ये जनजागृती करण्यासाठी आधुनिक साधनांचा वापर करणे ही काळाची गरज आहे. त्यामुळे हे कार्य करणाऱ्या संस्थांच्या या क्षेत्रातील कामांची व्याप्ती पाहून हे अनुदान तसेच, संस्थांची संख्या कमी अधिक करण्याचे अधिकार ग्राहक कल्याण निधी व्यवस्थापन समितीस राहतील.

सदरचा खर्च हा, जे-राखीव-८२२९, विकास कल्याण निधी ( अकरा ) ( ८२२९-५३२४) या ठेव लेख्यातून करावयाचा आहे. यास्तव ग्राहक कल्याण निधीमधून पुस्तकी समायोजनाने एकत्रित निधीमध्ये जमा करण्याच्या अटींच्या अधिन मागणी क्र.एम-२, मुख्य लेखाशिर्ष - २४०८ - अन्न साठवण व वखार साठवण, ०४ ग्राहक संरक्षण अधिनियम १९८६ अंतर्गत राज्य परिषद, राज्य आयोग आणि जिल्हा मंचाची स्थापना करणे

(०४)(०४) स्वैच्छिक ग्राहक संघटनांना अर्थसहाय्य (२४०८०२८९) ३३, अर्थसहाय्य (योजनेत्तर) या लेखाशिर्षाखाली त्या त्या आर्थिक वर्षी तरतूद करुन भागविण्यात यावा.

या शासन निर्णयान्वये या योजनेच्या उपरोक्त लेखाशिर्षाखाली उपलब्ध असलेल्या आर्थिक तरतुदीच्या मर्यादेतच केवळ नियमावलीत सुधारणा करुन नव्याने योजनेच्या अंमलबजावणीबाबत मार्गदर्शन करण्यात येत असल्यामुळे प्रशासकीय विभागाच्या अधिकारात हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०१७०७२८१७०१३९६१०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Swati Mhase Patil

Digitally signed by Swati Mhase Patil
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Food Civil Supplies And Consumer Protection Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9198652167706abf1515cbb7ffd9d0de8f0f145686cf64167e880e92001565b4, cn=Swati Mhase Patil
Date: 2017.07.28 17:07:16 +05'30'

**( स्वाती म्हसे - पाटील )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत माहिती व आवश्यक त्या कार्यवाहीस्तव अग्रेषित.**

१) मा.मंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव.
२) मा.राज्यमंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव.
३) मा. विरोधी पक्ष नेता ( विधानमंडळ )
४) मा.अध्यक्ष, राज्य ग्राहक कल्याण सल्लागार समिती यांचे स्वीय सहायक.
५) प्रधान सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे वरिष्ठ स्वीय सहायक.
६) सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग.
७) नियंत्रक, वैधमापन शास्त्र, मुंबई.
८) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय यांना व्यापक प्रसिध्दीसाठी विनंती करण्यात येत आहे.
९) सर्व विभागीय आयुक्त.
१०) सर्व जिल्हाधिकारी.
११) सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी.
१२) राज्य ग्राहक कल्याण निधी व्यवस्थापन समितीचे सर्व सदस्य.
१३) वित्तीय सल्लागार व उप सचिव, जी.टी.हॉस्पीटल, मुंबई.
१४) महालेखापाल (महाराष्ट्र १) (लेखा परिक्षक/लेखा अनुज्ञेयता, मुंबई.
१५) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१६) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१७) निवडनस्ती, ग्रासं-२.

## शासन निर्णय क्र: ग्राकनि-२०१७/प्र.क्र.५२ /ग्रासं-२, दि.२६.७.२०१७ च्या सोबतचे जोडपत्र

### ग्राहक जनजागृतीच्या क्षेत्रात कार्य करणाऱ्या नोंदणीकृत संस्थांना सहाय्यक अनुदान देण्याबाबतची मार्गर्शक सूचना.

१. ज्या संस्था जनतेसाठी ग्राहक जनजागृतीचे सादरीकरण निशुल्करित्या करेल अशा संस्था तसेच जनजागृतीचे जतन व संवर्धन करेल अशा संस्था अनुदानासाठी पात्र समजण्यात येतील.

२. राज्यातील प्रत्येक महसूली विभाग व मुंबई विभाग येथील संस्थाना अनुदानासाठी समान प्रतिनिधीत्व मिळण्याची दक्षता घेण्यात येईल.

३. ग्राहक जनजागृतीच्या क्षेत्रात कार्य करणाऱ्या नोंदणीकृत संस्थाना अनुदान देतांना खालील वेळापत्रकानुसार अनुदान वाटपाची कार्यवाही करण्यात येईल.

१. **जाहीरातीद्वारे अर्ज मागविणे:** अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागाने प्रतीवर्षी मार्च महिन्यात पुढील आर्थिक वर्षात अनुदान वितरीत करण्यासंदर्भात संस्थाकडून अर्ज मागविण्यासाठी सर्व जिल्हाधिकारी यांनी त्यांच्या जिल्हयातील प्रमुख वृत्तपत्रात व्यापक जाहिरात देण्याची कार्यवाही करावी.

२. **संस्थेने अर्ज सादर करावयाचा कालावधी:** वृत्तपत्रातील जाहिरातीनुसार प्रत्येक आर्थिक वर्षाच्या पहिल्या ३ महिन्याच्या कालावधीतच संबंधित जिल्हाधिकाऱ्यांकडे सोबत जोडलेल्या नमुन्यामध्ये अर्ज सादर करावा. त्यानंतर प्राप्त होणाऱ्या अर्जांचा त्या आर्थिक वर्षी अनुदान देण्यासाठी विचार केला जाणार नाही. पुढील आर्थिक वर्षी अनुदासाठी विहित मुदतीत नव्याने अर्ज करणे आवश्यक आहे.

३. **अर्जाची छाननी:** जिल्हाधिकारी कार्यालयाने विहित मुदतीत प्राप्त अर्जांची छाननी करुन ज्या संस्थांच्या अर्जामध्ये नियमावलीतील निकषानुसार त्रुटी आढळून येतील त्या संस्थाना संधी म्हणून त्रुटी पूर्तता करुन नव्याने अर्ज करण्याबाबत पत्र पाठविणे यासाठी जुलै व ऑगस्ट या २ महिन्यात ही कार्यवाही पूर्ण करण्यात येईल.

४. **त्रुटी पूर्ततेचा अहवाल सादर करणे:** त्रुटी पूर्ततेबाबत प्राप्त होणाऱ्या पत्रानुसार त्रुटींची पूर्तता करुन संस्थांनी संबंधित जिल्हाधिकारी यांच्याकडे त्रुटी पूर्तता अहवाल सादर करावा. त्यानंतर प्राप्त होणाऱ्या त्रुटी पूर्तता अर्जांचा त्या आर्थिक वर्षी अनुदान देण्यासाठी विचार केला जाणर नाही.

५. **छाननी समिती व अर्थसहाय्य समितीची बैठक:** संस्थांकडून प्राप्त त्रुटी पूर्तता अर्जांची छाननी समितीने करुन पात्र संस्थांच्या अर्जाबाबत अनुदान वितरीत करण्यासंदर्भात अर्थसहाय्य समितीची बैठक दि.३१ डिसेंबर, अखेरपर्यंत घेण्यात येईल.

६. **पात्र संस्थाना अनुदान वाटप करणे:** निधी व्यवस्थापन समितीच्या मान्यतेने पात्र संस्थांना अनुदान वाटप करण्याबाबत शासन निर्णय निर्गमित करण्यात येईल.

७. **नव्याने अर्ज मागविणे:** आर्थिक वर्षाच्या सरुवातीस देण्यात आलेल्या जाहिरातीनुसार प्राप्त अर्जांची छाननी करुन पात्र संस्थाना अनुदान वितरीत केल्यानंतर जर अर्थसंकल्पिय तरतूद

शिल्लक राहिली तर नोव्हेंबर महिन्यामध्ये नव्याने जाहिरात देऊन संस्थांकडून अर्ज मागविण्यात येतील.

४. ग्राहक जनजागृतीकडे प्राप्त होणाऱ्या अर्जाची छाननी करण्यासाठी खालीलप्रमाणे छाननी समिती गठित करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | सध्याचे पद | समितीतील पद |
|---|---|---|
| १. | सह सचिव, (ग्रासं-२), अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग | अध्यक्ष |
| २. | वित्तीय सल्लागार व उप सचिव, मुंबई | सदस्य |
| ३. | उप नियंत्रक, शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई | सदस्य |
| ४. | उप नियंत्रक, वैधमापनशास्त्र, मुंबई | सदस्य |
| ५. | अवर सचिव, (ग्रासं-२), अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग | सदस्य |
| ६. | कक्ष अधिकारी, (ग्रासं-२), अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग | सदस्य सचिव |

५. छाननी समितीने योजनेच्या निकषानुसार पात्र ठरविलेल्या संस्थांच्या प्रस्तावांना मंजुरी देण्यासाठी खालीलप्रमाणे निधी व्यवस्थापन समिती गठित करण्यात आली आहे.

१. मा.प्रधान सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग -- अध्यक्ष
२. वित्तीय सल्लागार व उप सचिव -- सदस्य
३. श्रीमती वर्षा राऊत -- सदस्य
४. श्री.रविंद्र साळुंखे -- सदस्य
५. सह सचिव (ग्रासं-२) -- सदस्य सचिव.

संस्थांना सहायक अनुदान देण्यासंर्भात तसेच अनुदानाच्या वर्गवारीमध्ये बदल करण्याबाबतचे अधिकार या समितीस असून त्याबाबत ही समिती अंतिम निर्णय घेईल.

६. सहाय्यक अनुदानासाठी अर्ज करणाऱ्या संस्थांनी खालील अटी पूर्ण केल्या पाहिजेत.

१. संस्था नोंदणी अधिनियम आणि सार्वजनिक विश्वस्त संस्था अधिनियम अंतर्गत नोंदणीकृत असली पाहिजे.
२. संस्थेच्या घटनेत ग्राहक जनजागृती हा महत्वाचा उद्देश असावा.
३. सहायक अनुदानाकरिता अर्ज करणारी संस्था किमान ३ वर्षापासून कार्यरत असावी.
४. संस्थेने मागील ३ आर्थिक वर्षात ग्राहक जनजागृतीच्या क्षेत्रात केलेले कार्य हे नि:शुल्करित्या केलेले असणे आवश्यक आहे. तसेच त्याव्दारे कोणतेही उत्पन्न मिळविलेले नसावे.
५. संस्थेच्या दरवर्षीच्या हिशोबाची तपासणी धर्मदाय आयुक्तांनी मान्यता दिलेल्या किंवा संमत्ती दिलेल्या परिक्षकाकडून किंवा सनदी लेखापालाकडून (चार्टर्ड अकाऊंटंट) करण्यात यावी. मागील ३ आर्थिक वर्षाच्या लेखापरिक्षणाच्या अहवालाच्या प्रतीत खालील बाबी नमूद केलेल्या असणे आवश्यक आहे.

I. नफ/तोटा पत्रक
II. जमा व खर्च लेखे
III. ताळेबंद

IV. ग्राहक जनजागृतीवर केलेल्या खर्चांच्या बाबींचा तपशील
V. सनदी लेखापालांचे लेखा परिक्षणात्मक अहवाल

७. संस्थेस एकदा अनुदान प्राप्त झाल्यानंतर पुढील ३ वर्षे सहायक अनुदान मिळणार नाही. चौथ्या वर्षी योजनेच्या निर्कषाच्या आधारे संस्थेच्या अर्जाचा अनुदानासाठी विचार करण्यात येईल.

८. संस्थांनी चुकीची कागदपत्रे सादर करुन सहाय्यक अनुदान प्राप्त केल्याचे आढळून आल्यास सदर संस्था भविष्यात शासनाच्या अनुदानासाठी कायमस्वरुपी अपात्र ठरविण्यात येईल. तसेच सदर संस्थेवर कायदेशीर कार्यवाही करण्यात येईल.

९. अर्थसहाय्य देताना संस्थांकडून प्राप्त होणारे अर्ज आणि त्यावर्षी सदर योजनेखाली उपलब्ध असणारी तरतूद विचारात घेऊन खालील संस्थाना अनुदानासाठी प्राधान्य देण्यात येईल.

१. ज्या संस्थांच्या मागील ३ आर्थिक वर्षात लेखापरिक्षण अहवालात कोणतेही विपरीत आक्षेप नाहीत, अशा संस्था.
२. ज्या संस्थांच्या मागील ३ आर्थिक वर्षात ज्यांनी विविध नामांकित आणि मान्यताप्राप्त अशा ग्राहक जनजागृतीच्या क्षेत्रात उल्लेखनीय यश मिळविले आहे अशा संस्था.
३. ज्या संस्थांच्या मागील ३ आर्थिक वर्षात ग्राहक जनजागृतीच्या क्षेत्रात केलेले कार्य नाविन्यपूर्ण व वैशिष्ट्यपूर्ण आहे, अशा संस्था.
४. ज्या संस्थांनी जनजागृतीच्या क्षेत्रात राज्य/देश तसेच आंतरराष्ट्रीय पातळीवर उल्लेखनीय कामगिरी केली आहे अशा संस्था.
५. ग्रामीण भागात, आदिवासी दुर्लक्षित भागात आणि औद्योगिक क्षेत्रात जनजागृतीचे कार्यक्रम करणाऱ्या संस्थांबाबत प्राधान्याने विचार करण्यात येईल.

१०. संस्थांनी ग्राहक जनजागृतीचे सादरीकरण, जतन व संवर्धन करताना खालील बाबी कटाक्षाने टाळण्याची दक्षता घेणे आवश्यक आहे.

१. जातीय किंवा धार्मिक विव्देष उफाळून येईल किंवा बळावेल, असे कोणतेही कार्य करता येणार नाही, किंवा असा कोणताही कार्यक्रम सादर करता येणार नाही.
२. शासकीय धोरण किंवा सामाजिक नितिमत्ता यांच्याविरुध्द असलेला कोणत्याही गोष्टीचा आपल्या कार्यात किंवा कार्यक्रमात समावेश करता येणार नाही.
३. विशिष्ट व्यक्तीवर टिका करणारा कार्यक्रम सादर करता येणार नाही.
४. राजकीय वाद किंवा हिंसाचार उद्भवेल किंवा वाढेल असे कार्य किंवा कार्यक्रम सादर करता येणार नाहीत.

११. संबंधित जिल्हाधिकारी व नियंत्रक, वैधमापन शास्त्र कार्यालयाने अनुदान संस्थाना वितरीत केल्यावर खर्चाचे विवरणपत्र संबंधित संस्थेकडून प्राप्त करुन घवून उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापाल यांचे संकेतस्थळावर सादर करण्यात यावे.

## शासन निर्णय क्र: ग्राकनि-२०१७/प्र.क्र.५२ /ग्रासं-२, दि.२६.७.२०१७ च्या सोबतचा अर्जाचा नमुना

प्रति,

१) नियंत्रक वैधमापन, मुंबई व मुंबई उपनगर क्षेत्राकरिता

२) संबंधित जिल्हाधिकारी, (मुंबई व मुंबई उपनगर वगळून उर्वरीत सर्व जिल्हयांसाठी)

ग्राहक जनजागृतीच्या क्षेत्रात कार्य करणाऱ्पा नोंदणीकृत संस्थांना सहाय्यक अनुदान या योजनेअंतर्गत हा अर्ज सादर करीत आहोत. या योजनेशी संबंधीत नियमावली आम्ही वाचली असून त्यातील अटी/शर्ती आम्हांला पूर्णत: मान्य आहेत. या योजनेअंतर्गत सहाय्यक अनुदान प्राप्त होण्यासाठी आम्ही अर्ज करीत असून खालीलप्रमाणे संस्थेची व तिच्या कार्यालयाची संक्षिप्त माहिती तसेच त्यासोबत आवश्यक ती सर्व कागदपत्रे जोडत आहोत.

| अ.क्र. | बाब | संस्थेची माहिती |
|---|---|---|
| १ | संस्थेचे नाव, पत्ता व दुरध्वनी क्रमांक, ई-मेल तसेच वेब साईट असल्यास त्याबाबतची माहिती | |
| २ | संस्थेच्या स्थापनेचे वर्ष | |
| ३ | संस्था नोंदणी अधिनियम/सार्वजनिक विश्वस्त संस्था अधिनियम अंतर्गत नोंदणी क्रमांक **(संस्थेच्या नोंदणीच्या प्रमाणपत्राची छायांकित सत्यप्रत सोबत जोडणे आवश्यक आहे.)** | |
| ४ | संस्थेचे कार्यक्षेत्र (शहरी/ग्रामीण/औद्योगिक/आदिवासी) | |
| ५ | संस्थेचे ग्राहक जनजागृती कार्याचे उद्दीष्ट (सादरीकरण/जतन/संवर्धन) | |
| ६ | मागील ३ वर्षात संस्थेने कोणत्या क्षेत्रात व कोणत्या स्वरुपाचे कार्य केले आहे त्याबाबत थोडक्यात माहिती (**संस्थेने केलेल्या कार्याबाबत जोडावयाच्या कागदपत्रे ही खालील टिपमधील माहितीनुसार देण्यात यावी.**) | |
| ७ | संस्थेच्या मागील उत्पन्नाचे प्रमुख स्त्रोत कोणते? | |
| ८ | मागील ३ आर्थिक वर्षात संस्थेने नामांकित अथवा मान्यताप्राप्त कार्यासाठी मिळविलेल्या उल्लेखनीय यशाची माहिती. (**त्याबाबतच्या प्रमाणपत्राची छायांकित सत्यप्रत सोबत जोडणे आवश्यक आहे**) | |
| ९ | संस्थेने ग्राहक जनजागृतीच्या क्षेत्रात राज्य/देश पातळीवर केलेल्या उल्लेखनीय कामगीरीची थोडक्यात माहिती (**त्याबाबतच्या प्रमाणपत्राची छायांकित सत्यप्रत सोबत जोडणे आवश्यक आहे.**) | |
| १० | मागील ३ आर्थिक वर्षात केंद्र शासन/राज्य शासन यांच्याकडून ग्राहक जनजागृतीच्या क्षेत्रातील कार्याबद्दल निधी मिळाला असल्यास त्याबाबतची माहिती (**संबंधीत आदेशाची छायांकित सत्यप्रत**) | |
| ११ | संस्थेला अनुदानासाठी पात्र ठरविल्यास त्यांच्या बँक खात्यात अनुदानाची रक्कम जमा करण्यासाठी संस्थेच्या बँकेचे नाव, ठिकाण, खातेधारकाचे नाव, MICR व IFSC संकेतांक नंबर, पॅनकार्ड नंबर व खाते क्रमांक याबाबतची माहिती. | |

**टिप:** मागील ३ वर्षात संस्थेने ग्राहक जनजागृतीच्या क्षेत्रात कोणत्या स्वरुपाचे कार्य केले आहे. त्याबाबत माहिती सादर करतांना खालीलप्रमाणे कागदपत्रे जोडणे अत्यावश्यक आहे :-

१. केलेल्या कार्यक्रमांची मूळ छायाचित्रे (Original Photos) सादर करावीत.
२. संस्थचे नाव, कार्यक्रमाचे नाव, दिनांक व ठिकाण इ.बाबींचा स्पष्ट उल्लेख असणारा फलक अथवा बॅकड्रॉप कार्यक्रमाच्यामागे लावणे अत्यावश्यक असून कार्यक्रमाच्या मूळ छायाचित्रात सदर फलक असणे आवश्यक आहे.
३. कार्यक्रमाची स्मरणपत्रीका असल्यास तिची प्रत सादर करावी.
४. कार्यक्रमात मान्यवरांचे अभिप्राय असल्यास त्याची प्रत सादर करावी.
५. कार्यक्रमाशी संबंधीत वृत्तपत्रामध्ये प्रसिध्द झालेले वृत्तांत अथवा परिक्षणे (वृत्तपत्राचे नाव आणि वृत्तांताच्या वार व दिनांकासह)
६. कार्यक्रमांच्या निमंत्रणपत्रिका, हँडबील, कार्यक्रमाच्या जाहिरातीचे कात्रण.
७. ग्राहक जनजागृतीचे जतन व संवर्धन करणाऱ्या संस्थांना वरील अनुक्रमांक १ ते ६ येथील कागदपत्रे जोडण्याची आवश्यकता नसून त्यांनी केलेल्या कार्याचे मूळ पुरावे शासनास सादर करावेत.

वरील सर्व माहिती व सोबत प्रमाणित केलेली कागदपत्रे खरी आहेत. वरील माहिती व कागदपत्रे खोटी/चुकीची असल्याची आढळल्यास संस्थेच्या पदाधिकाऱ्यांवर कारवाई होऊ शकते याची आंम्हाला कल्पना आहे.

अध्यक्ष / सचिव
नाव, पत्ता व स्वाक्षरी